# कंठम्मा

## बांधकाम स्त्रीमजूराची कथा

लेखिकाः जे. एच. सीता
चित्रः आर. एल. मिथरादिर
मराठीतः प्रभाकर नानावटी
ICRA, बेंगळूरू 1986





**कंठम्मा गाढ झोपेतून उठली.**
**चर्चची घंटा वाजत होती.**
**आपण फार वेळ झोपलो याची जाणीव तिला झाली.**
**सूर्य आताच वर येत होता.**


तिने चारीकडे नजर फिरवली.


पार्वती व कनगी, तिची मुलं,
चिकटून झोपलेली होती.


आणि तिच्या शेजारी बाळ झोपल होतं. - ताई


तिचा मुलगा, भक्त, झोपला होता. तो कमावणारा मुलगा.कँपच्या बंगल्यात माळीच्या हाताखाली काम करत होता.
ती हळूच पार्वतीला उठवली. तिला चूल पेटवायचे होते.




कंठम्मा प्लॅस्टिकची कळशी घेऊन पाणी भरण्यासाठी बाहेर पडली.

ती बाहेर पडली. नळाजवळ कुणीही नव्हते. सामान्यपणे चार-पाच बायका पाणी येण्याची वाट पाहत उभे असायचे. आज कुणीही नव्हते.



अक्कम्मा तेथेच उभी होती.




काल ऑटोमधून ओरडून सांगत असलेले तू ऐकली नाहीस का? नळाच्या पाण्याची वेळ बदलली आहे, असे सांगत होता. आजपासून फक्त संध्याकाळी येणार.
पण मी संध्या-काळ नंतर परत येते. स्वयपाकाला पाणी कुठून आणू?


कंठम्मा तुझ्या त्या आळशी मुलींना कामं शिकव.
कान्वेंट शाळेत शिकून काय उपयोग? खरे पाहता शाळा शिकूनच काय उपयोग?
परंतु कंठम्माने तिच्या बोलण्याकडे लक्ष दिले नाही.






चर्चच्या विहिरीकडे पळतच गेली.

चर्चच्या बाहेर कुणीही नव्हते. सर्व प्रार्थनेसाठी आत गेले होते.



तिने दोरीला कळशी बांधून पाण्यात सोडली. आवाज करत कळशी भरली.


तितक्यात कोपऱ्यातून आवाज आला.
कोण आहे?
सिस्टर तिच्याकडे बघत होती.
सिस्टरला बघून तिला आश्चर्य वाटले.


मी आहे सिस्टर, आजपासून पाण्याच्या वेळेत बदल झाला आहे. स्वयपाकाला पाणी नाही.


सिस्टर, आज मी पार्वतीला शाळेला पाठवू शकत नाही.तिला पाणी भरावे लागेल. भक्त कामावर जात असल्यामुळे तो पाणी भरू शकत नाही.
सिस्टरला सर्व काही उमजत होते. ती गप्प बसली.


कंठम्मा पळत येताना
कळशीतील अर्धे अधिक
पाणी सांडून गेले होते.


बाळ उठून पोट सवरत चुली-
पाशी आले होते.


इतर कुणीही उठले नव्हते.
पार्वती, ऊठ! आळशी मुलगी!
रागातच ती ओरडली.


तू आज शाळेला जाऊ नकोस.
दूपारी पाणी भर.
तसे पाहिल्यास शाळेचा काहीही उपयोग नाही.


कनगीला शाळेला कोण घेऊन जाणार?
कनगी स्वतः जात नसेल तर तिला पण शाळा नको.
पार्वती रडायला लागली.

भात शिजवल्यानंतर भक्ताला पहिल्यांदा वाढली.



मग पार्वतीला व कनगीला जेऊ घातली.

कंठम्माने भक्तासाठी डबा तयार करून दिला.



बाळाला पेज करून भरवली.
त्यानंतर स्वतःचा डबा घेऊन पळतच सुटली.



बाळाला खांद्यावर घेऊन किती पळाली तरी उशीर झालाच होता.



रोजच्यासारखा टेंपो जागेवर नव्हता.

टेंपो गेल्यामुळे बसच भाडं द्याव लागणार. आणि कंत्राटदाराचे शिव्या ऐकून घ्यावे लागणार.





हो, टेंपो गेला होता.

कंठम्मा बससाठी थांबली. रस्त्यावर भरपूर माणसं.
कित्येक बायका घाईघाईने जात होत्या.



या बायका इतक्या मोकळ्या कशा काय?कुणाच्याही हातात बाळ नव्हते.

कदाचित घरकामासाठी बायका असणार. कंठम्मासुद्धा अशाच एका घरात कामाला होती.

भरपूर वेळेनंतर बस आली.



गर्दीतून  ती आत कशीबशी शिरली.




बांधकामाच्या जागेवर पोचायला बराच उशीर झाला होता.




बसमधून उतरून ती पळतच सुटली.


कामाला सुरुवात झालेली होती. पुरुष व बायका रांगेत उभारून सिमेंटच्या टोपल्या पुढे सरकवत होत्या. कुणी तिला बघितलेले नव्हते.
घाई घाईने मैदानाच्या एका कडेला मुलं झोपलेल्या आसऱ्या-पाशी गेली.

ताईसाठी थोडीशी जागा करून झोपवली.
कंठम्माची कामं संपेपर्यंत ताईला तेथेच रहायचे होते.



कंठम्मा डोक्याला कापड गुंडाळून मजूरांच्या रांगेत उभी राहिली.
कंत्राटदाराने अगोदरच तिला पाहिलेले होते.




ती शिडीवर चढून चबुतऱ्यावर जाऊन थांबली.


तिच्या मैत्रिणी - लक्ष्मी, सरोज, रमीझा, अंथोनम्मा - तेथेच होते. ती शिडीवरून चढताना सर्वजण हसत होते.
अजून काही वेळ ते हसले असते. कारण सिमेंट मिक्सिंग मशीन बिघडलेले होते.  परंतु यात हसण्यासारखे काय आहे? सिमेंट नसल्यास मजूरी नाही...

स्टीलच्या टोकदार तारा तिच्या पायाच्या तळव्याला टोचत होत्या. उभ्या उभ्या ती काही तरी शोधत होती. तिला दोन लाकडी फळकुट्या सापडल्या. ती त्यावर उभारली.



काही वेळाने सिमेंटच्या टोपल्या वर सरकू लागल्या.




गवंडी जोराने खेकसत होता.

बायका घाई घाईने पुढे झाल्या. आपल्या हिश्याचे काम पूर्ण न केल्यास मजूरी कापली जाईल, ही भीती.




लवकर!
लवकर... !!



टोपली वाट बघत होती.



7 किलो वजनाची.



न थांबता चालणारी.



घड्याळासारखी..



टोपल्या मोजता मोजता



दिवस संपतो.



तरी अजून एक टोपली रांगेत आहेच.


सिमेंट येतच आहे.


न थांबता...


तुमचा हिश्याचे काम संपल्यानंतरच


तुमच्या हातात त्या दिवसाची मजूरी.




रुक्मिणीला माझी जागा घ्यायला सांग की


रुक्मिणीला कंठम्माच्या जागेत जायला सांग.


रुक्मिणी तू खाली जा. कंठम्माच्या जागेत.


रुक्मिणी खाली उतरून कंठम्माच्या जागेवर गेली.


कंठम्मा खाली उतरली.


बाळाला दूध पाजली.


ती चबुतऱ्यावर चढत होती. सिमेंट मिक्सिंग मशीन पुन्हा बिघडले. पुरुष माणसं दुरुस्त करत होते. यात काही वेळ गेला. जेवणाची सुट्टी होईल का?


हो, जेवणाची सुट्टी झाली.

सर्व जण जेवण करत असताना सरोज सांगत असलेली गोष्ट कंठम्मा ऐकत होती.











रोज भांडण. शिव्यांची लाखोली. शेवटी त्याला यांच्याकडून काही मिळणार नाही याची खात्री झाली. त्यांनतर ही दुर्घटना.

तिच्या साडीला आग लागली होती. तिला आग विझवता येईना.



आगीतून बाहेर पडण्याचा प्रयत्न करत होती. बाहेरून दरवाज्याला कडी लावलेली होती.



आग पसरू लागली.



जोरजोराने ती दरवाज्याला मारू लागली. ओरडू लागली. कुणालाही ते ऐकू आले नाही.



गीता भाजून होरपळून मेली.





परंतु लोक चुकून झालेली दुर्घटना असे म्हणतात. तो तिच्या अंगावर रॉकेल ओतून आग लावून बाहेरून दरवाज्याला कडी लावला होता म्हणे.


रमीझा पुढे सांगू लागली.
तिच्या शेजारी एक बाई होती. तिला एक मूल होत. मुलगी. तिला बरे वाटत नव्हते. ती दवाखान्यात गेली.


डॉक्टरानी तिला तपासले. यापुढे तुला मूल होणार नाही. डॉक्टर म्हणाले.


तिचा नवरा चिडला.
मला मुलगा हवा होता. आता तुला मूल होणार नाही.


बायको म्हणून तुझा काही उपयोग नाही.
घर सोडून जा. या पोरीला पण घेवून जा.
काही तरी करून तिला संपव.


त्याच रात्री ती बाहेर पडून एका विहिरीपाशी आली. त्या जिल्ह्यातील जास्त खोल असलेली ती विहीर!


मुलीला छातीस धरून विहीरीत उडी मारली.
पोलीसांनी आत्महत्या म्हणून केस मिटवली.










या, लवकर या !

कंत्राटदाराचा आवाज.

जेवण झाले होते. सगळे कामाला हाजर.




पहिल्या-पहिल्यांदा असल्या कामामुळे फार थकवा येत होता. ट्रक भरून आणलेल्या फरश्या उचलाव्या लागत होत्या. आता हे सर्व सोपे वाटत आहे.



रुक्मिणी सांगत होतीः




त्यांच्यासाठी
आपण दगडच !


आम्हाला पिळून काढतात.
तू असा विचार करू नये.


आपण ऊन - पावसात काम करावे. त्यानी बसून खावे.
ते विचार करत असतात. आपल्या उद्योगाबद्दल विचार करत असतात.


उद्योग कसला?
फायद्याच्या गोष्टी...


आमच्यासारख्या बायकांच्या जिवावर फायदा करून घेतात.







परंतु रुक्मिणीच्या प्रश्नाबद्दल ती विचार करू लागली.



बाकीचा दिवस तसाच गेला. दिवसाच्या शेवटी गोड बातमी आली. सगळे या. पगार द्‌यायचा आहे.




इतका वेळ थांबलेले सार्थक झाले.




तिचा नवरा कण्णप्पा. बेवडा.
कायम घराबाहेरच असायचा.

सगळे पगाराच्या रांगेत उभे राहिले.




तितक्यात बायकाच्या रांगेतून आरडा ओरडा ऐकू आला.
हे काय?आई ग!


ती रुक्मिणी. कंत्राटदाराने सहजपणे तिच्या पाठीवर हात फिरवली. तू खालच्या जातीची. तक्रार करायचं नाही.
रुक्मिणी त्याच्या तोंडावर थुंकली.


कंत्राटदार रागाने लालबूंद झाला.
तुला पगार नाही!


तिला हाकलून द्या.
बाकीच्या बायकांनी तिला लांब नेले.


वयस्कर बायका कंत्राटदाराशी हुज्जत घालू लागले.
गप्प बसा. त्याबद्दल काही बोलायचे नाही. नाहीतर तुम्हालाही पगार नाही.


ते गप्प बसले.


कंठम्माची पाळी आल्यानंतर हातात पडलेले पैसे घेऊन बाहेर पडली. पाच रुपये कमी होते.


भांडण करणे व्यर्थ!


घरी पोचेस्तोपर्यंत संध्याकाळ झाली होती.

वाटेत किराणा दुकानापाशी थांबून सामान व मुलांसाठी मिठाई घेतली. तेथे लक्ष्मियम्मा उभी होती.






ती घरी गेली. आत पाय ठेवायच्या अगोदर क्षणभर घुटमळली. तो घरात असावा. कुठे आवाज नाही. काही त्रास नसेल. आत घरात शिरली.


घरात पाय ठेवली.
तो जमिनीवर निपचित पडला होता.


हे काय?
मोगऱ्याची फुलं. तिच्यासाठी आणलेले.
आणि मुलांसाठी मिठाई.

स्वयपाक करत असताना भक्ताने सर्व हकीकत हळूच सांगितली. तिला सगळे माहित झाले.




तेव्हा तिला फूलांचे व मिठाईचे रहस्य कळाले.




तिचा नवरा जागा होता.


तिने त्याच्यासाठी पाणी आणले होते.


पाणी गटगटा पिऊन टाकला.


तू मला अशी का बघत आहेस? फुलं आवडली नाहीत का? तुझ्यासाठी आणले होते.
हो. परंतु यासाठी पैसे कुठून मिळाले हे पण मला माहित आहे.


त्याला राग आला.
WHACK










ती काही वेळ फुलाकडे बघत होती. तिच्या नाकातून बाहेर पडलेल्या रक्तामुळे फुलं ओली झाली होती. ती किती स्वप्न बघत होती! परंतु नवऱ्याच्या  शिव्या व नाकातून भळभळणारे रक्त वास्तवाची जाण करून देत होत्या. परंतु हे सुद्धा स्वप्नच वाटू लागले. यापेक्षा तो जास्त मारणार नाही. जास्त त्रास देणार नाही. हे सर्व अनेक वेळा झालेले होते. तिच्या अंगवळणी पडले होते. त्याला सामोरे जाण्याइतपत माझ्यात सामर्थ्य नाही. एके दिवशी ते सामर्थ्य नक्कीच येईल. ते सामर्थ्य शारीरिक सामर्थ्यापेक्षा किती तरी पटीने जास्त असेल...